**राज्यात मुंबई व औरंगाबाद येथे शासकीय न्यायसहाय्यक विज्ञान संस्था सुरु करण्याबाबत**
**सदर संस्थेतील कर्मचाऱ्यांचे वेतन व इतर वेतनेतर खर्चासाठी रु. १९.०० लक्ष खर्चास मंजूरी.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्र. अर्थसं२००९/(९०/०९)/मशि-३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ०९ नोव्हेंबर, २००९

पहा:- १) शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. अर्थसं२००९ /फॉरेन्सीक इन्स्टी/नवीन बाब/लेखा-२, दि.२५ मे, २००९
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र एनजीसी२००९/(१३४/०९)मशि-४ दिनांक १७ ऑगस्ट, २००९
३) शासन परीपत्रक, वित्त विभाग क्र अंदाज १०.०९/प्रक्र१५१/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक ३० जून, २००९

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.२ अन्वये न्यायसहाय्यक विज्ञान क्षेत्रात शिक्षित मनुष्य बळ तयार करण्यासाठी राज्यात मुंबई व औरंगाबाद येथे शासकीय न्याय सहाय्यक विज्ञान संस्था स्थापन करण्यास तसेच, या दोन्ही न्याय सहाय्यक विज्ञान संस्थांसाठी व सल्लागार कक्षाची पदे निर्माण करण्यास मंजूरी देण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर संस्थेमध्ये नियुक्त करण्यात येणाऱ्या कर्मचाऱ्यांचे वेतन व इतर वेतनेतर खर्चासाठी रु. १९.०० लक्ष निधी जून, २००९ च्या अर्थसंकल्प अधिवेशनामध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेला असून सदर रु. १९.०० लक्ष इतक्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

संदर्भ क्र. ३ येथे उध्दृत वित्त विभाग परिपत्रकाच्या अनुषंगाने सन २००९-१० करीता राज्यातील मुंबई व औरंगाबाद येथे शासकीय न्याय सहाय्यक विज्ञान संस्थेमध्ये नियुक्त करण्यात येणाऱ्या कर्मचाऱ्यांचे वेतन व इतर वेतनेतर खर्चासाठी रु. १९.०० लक्ष (रुपये एकोणीस लक्ष फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास शासनाची मंजूरी देण्यांत येत आहे. सदरचा निधी मासिक निधी विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्यात यावा.

२. याबाबत होणारा खर्च २२०२, सर्वसाधारण शिक्षण (०३) विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०३ शासकीय महाविद्यालये व संस्था (०२)(०३) राज्यात नवीन न्यायसहाय्यक विज्ञान/ न्यायसहाय्यक विज्ञान संस्था सुरु करणे, राज्य योजनांतर्गत योजना (२२०२ एच ०८२) डब्ल्यु २ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व मंजूर सरतूदीतून भागविण्यात यावा.

३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांनी शासन परिपत्रक वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ मधील सुचनांनुसार आवश्यक ते पुरक आदेश निर्गमित करावेत व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या औपचारिक संदर्भ क्रमांक ६९५/०९ / व्यय ५, दि. १२.१०.२००९ अनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९११०९१६१६००००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

र.बा.मयेकर

( र.बा.मयेकर )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

सर्व विभागीय शिक्षण सहसंचालक, उच्च शिक्षण.

महालेखापाल, ( लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,

सर्व जिल्हयांचे कोषागार अधिकारी.

वित्त विभाग, व्यय-५, मंत्रालय, मुंबई.

नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

कार्यासन मशि-४/साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई

निवड नस्ती (कार्यासन - मशि-३)